**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन, एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या विनाअनुदानित संस्थांच्या विलीनीकरणास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून शासन मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२५/प्र.क्र. १६५/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: २० जून, २०२५.**

**संदर्भ :-** संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. २/एनजीसी/संस्था विलीनीकरण Karmaveer/२०२५/४०९, दि.२२.०५.२०२५.

**प्रस्तावना :-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्रशिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या विनाअनुदानित संस्थांच्या विलीनीकरणास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील सोबतच्या **"प्रपत्रामध्ये"** दर्शविलेल्या एकाच व्यवस्थापनामार्फत सुरु असलेल्या विनाअनुदानित संस्थांच्या विलीनीकरणास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता करणे, संबंधित महाविद्यालय / संस्थांवर बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संबंधित महाविद्यालय / संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांच्याशी करारनामा करावा लागेल. तसेच, आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण यांच्या संमतीने समाधानकारकरित्या पूर्ण करावी.

४) संबंधित महाविद्यालय / संस्थेने, संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) प्रस्तुत विलीनीकरणानंतरची प्रवेश क्षमता अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता मंजूर केल्याप्रमाणे राहील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क महाविद्यालयाने आकारल्यास, संबंधित महाविद्यालय / संस्थेवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संबंधित महाविद्यालय / संस्थेने अभ्यासक्रम चालविण्याकरिता शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली व संबंधित विद्यापीठाच्या मानकानुसार नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच, शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इ. बाबत तसेच, विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संबंधित महाविद्यालय / संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संबंधित महाविद्यालय / संस्थेने ग्रंथालयाकरिता आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक राहील. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंगसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे संबंधित महाविद्यालय / संस्थेवर बंधनकारक राहील.

१०) संबंधित महाविद्यालय / संस्थेने सदर अभ्यासक्रम चालविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेकरिता शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्यास त्यांची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित महाविद्यालय / संस्थेवर राहील.

११) शासन निर्णय दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित महाविद्यालय / संस्थेने भरणा केले नसेल, तर ते संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय यांनी संबंधित महाविद्यालय / संस्थेकडून भरणा करुन घ्यावे.

१२) महाविद्यालयाने/संस्थेने संबंधित विद्यापीठाचे संलग्निकरण प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संबंधित संस्था / महाविद्यालयावर बंधनकारक राहतील.

३. या शासन मान्यतेनुसार उक्त संस्था / महाविद्यालयातील अभ्यासक्रमांचा केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये समावेश होण्याकरिता संचालक, तंत्र शिक्षण यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६२०१३०८०३१२०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: CN = THORAT AJITKUMAR ARUNRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2025.06.20 13:08:57 +05'30'

**(अजितकुमार थोरात)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत :-

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) संबंधित संस्था/ महाविद्यालय (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती (तांशि-४)

प्रपत्र

HTED G.R.No.Manyata-2025/C.R.165/TE-4, Dated: 20th June, 2025

Merger of Unaided Institution under the same Trust/Society/Company operating in the same campus or city approved by AICTE From 2025-26

| Sr. No. | Institue Code, Name and Address of Merger Instituions | Institute Code, Name and Address of the Institute after Merging | Program | Affiliating Body | Level | Name of Course | Intake Approved for 2024-25 | Intake Approved for 2025-26 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | **PARENT INSTITUTION** **5636-** KARMAVEER KAKASAHEB WAGH ARTS COMMERCE SCIENCE AND COMPUTER SCIENCE COLLEGE CHANDORI A/P.CHANDORI TAL. NIPHAD DIST. NASHIK - 422 201 **(Permanent ID 1-44512938764)** **CHILD INSTITUTION** **5630 -** KARMAVEER KAKASAHEB WAGH ARTS COMMERCE SCIENCE AND COMPUTER SCIENCE COLLEGE CHANDORI A/P.CHANDORI TAL. NIPHAD DIST. NASHIK - 422 201 **(Permanent ID 1-44492219324)** | **5636 -** KARMAVEER KAKASAHEB WAGH ARTS COMMERCE SCIENCE AND COMPUTER SCIENCE COLLEGE CHANDORI A/P.CHANDORI TAL. NIPHAD DIST. NASHIK - 422 201 | COMPUTER APPLICATIONS | Savitribai Phule Pune University, Pune | UNDER GRADUATE | BCA | 80 | 80 |
| | | | MANAGEMENT | Savitribai Phule Pune University, Pune | UNDER GRADUATE | BBA | 80 | 80 |
| | | | COMPUTER APPLICATIONS | Savitribai Phule Pune University, Pune | UNDER GRADUATE | BCA | 80 | 80 |

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: CN = THORAT AJITKUMAR ARUNRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2025.06.20 13:09:04 +05'30'